१३ वा वित्त आयोग

**पंचायत राज संस्थांनी (जि.प./पं.स./ग्रा.पं.) १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून लेखापाल Accountant) तथा संगणक ऑपरेटर/ कनिष्ठ अभियंता व संगणक तज्ञ (Computer Experts) यांची आऊटसोर्सिंग पध्दतीने कंत्राटी स्वरुपात सेवा उपलब्ध करुन घेणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक ,क्रमांक- तेविआ २०१०/प्र.क्र.७३ /वित्त-४**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- ८ डिसेंबर,२०१०.**

वाचा-१) शासन निर्णय क्र तेविआ-२०१०/प्र.क्र.२२/वित्त-४ दिनांक ३०/८/२०१०.

२) शासन परिपत्रक क्र तेविआ-२०१०/प्र.क्र.२२/वित्त-४ दिनांक ३०/८/२०१०.

**प्रस्तावना-** ७३ व्या घटना दुरुस्तीनुसार पंचायत राज संस्थांना राज्य शासनाच्या विविध कामांचे हस्तांतरण करण्यात आले आहे. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांचे व कार्यक्रमांचे (उदा. महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना (MREGS), मागास क्षेत्र विकास निधी (BRGF), राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान (NRHM) ,सर्व शिक्षा अभियान (SSA), संपूर्ण स्वच्छता अभियान (TSC), तेरावा वित्त आयोग (TFC) व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणें अंतर्गत विविध योजना ) यांचे नियोजन व अंमलबजावणी करण्याची जबाबदारी पंचायत राज संस्थांच्या तिन्ही स्तरावर पार पाडली जात आहे. तसेच, पंचायत राज संस्थांवर सोपविल्या जाणा-या जबाबदारीत दिवसेंदिवस वाढच होत आहे. मात्र या सर्व योजना व कार्यक्रमांची अंमलबजावणी परिणामकारकरित्या होण्यासाठी पुरेसे व सक्षम मनुष्यबळ आवश्यक आहे.सद्यःस्थितीत असा पुरेशा सक्षम तांत्रिक मनुष्यबळाची कमतरता पंचायत राज संस्थांना भासत आहे.त्यासाठी पंचायतींना सक्षम तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करून देण्याची शिफारस तेराव्या वित्त आयोगाच्या अहवालात करण्यात आली आहे.

१३ व्या वित्त आयोगांतर्गत पंचायत राज संस्थांना वितरीत केलेल्या निधीतून हाती घ्यावयाच्या बाबींसंदर्भातील मार्गदर्शक सूचना **दिनांक ३० ऑगस्ट २०१०** च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयान्वये **जनरल बेसिक ग्रँट व जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या तसेच स्पेशल एरिया बेसिक ग्रँट व स्पेशल एरिया परफॉर्मन्स ग्रँटच्या वितरीत निधीतून** ग्राम पंचायत,पंचायत समिती व जिल्हा परिषद या तिन्ही स्तरावर तांत्रिक मनुष्यबळाची सेवा आऊटसोर्सिंगच्या माध्यमातून कंत्राटी स्वरुपात उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्यास पुढीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक-**

**अ) ग्रामपंचायत स्तरावर नेमावयाचे तांत्रिक मनुष्यबळ -**

१) ग्रामपंचायतींनी त्यांच्या स्तरावर करण्यात येणा-या बांधकामाच्या तांत्रिक देखभालीसाठी व कामासाठी कंत्राटी पद्धतीने कनिष्ठ अभियंता घेणे .

२) ग्रामपंचायतींसाठी त्यांचे लेखे प्रिया सॉप्ट ( Model Accounting System) या Web Based on line आज्ञावलीत ठेवण्यासाठी कंत्राटी पद्धतीने लेखापाल (Accountant) तथा संगणक ऑपरेटर घेणे.

**ब) पंचायत समिती स्तरावर नेमावयाचे तांत्रिक मनुष्यबळ -**

१) पंचायत समितीनी e-PRI अंतर्गत येणा-या प्रिया सॉफ़्ट सारख्या विविध आज्ञावलीत संगणकिय कामकाजासाठी कंत्राटी पद्धतीने संगणक ऑपरेटर तथा लेखापाल घेणे.

२) पंचायत समितीं स्तरावर एक संगणक तज्ञ (Computer Expert) घेणे.

**क) जिल्हा परिषद स्तरावर नेमावयाचे मनुष्यबळ -**

१) जिल्हा परिषदांनी संगणकिय कामकाजासाठी कंत्राटी पद्धतीने संगणक तंज्ञ (Computer Experts) घेणे.

ग्रामपंचायत स्तरावर नेमावयाच्या कनिष्ठ अभियंता, लेखापाल तथा संगणक ऑपरेटर , पंचायत समिती स्तरावर नेमावयाच्या संगणक तज्ञ व लेखापाल तथा संगणक ऑपरेटर तसेच, जिल्हा परिषद स्तरावर नेमावयाच्या संगणक तज्ञ यांच्या आऊटसोर्सिंग पध्दतीने कंत्राटी स्वरुपात सेवा उपलब्ध करुन घेण्यासाठी आवश्यक अटी व शर्ती व त्याबाबतची कार्यपध्दती या संदर्भातील सविस्तर सूचना पुढीलप्रमाणे देण्यात येत आहेत. त्यानुसार सर्व जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी कार्यवाही करावी.

*** ग्रामपंचायत स्तरावर लेखापाल (Accountant) तथा संगणक ऑपरेटर घेण्यासाठी लोकसंख्येचे निकषः-**

| लोकसंख्येचे निकष | लेखापालांची संख्या |
|---|---|
| (१) दहा हजारापेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या प्रत्येक ग्रामपंचायतींसाठी - | १ |
| (२) पाच हजाराचे वर ते दहा हजारचे आंत लोकसंख्या असलेल्या दोन ग्रामपंचायतींसाठी- | १ |
| (३) दोन हजाराचे वर ते पाच हजार पर्यंत लोकसंख्या असलेल्या, ज्यांची एकत्रित लोकसंख्या दहा हजाराचेवर आहे अशा तीन ग्रामपंचायतींसाठी- | १ |
| (४) दोन हजारा पर्यन्त लोकसंख्या असलेल्या, ज्यांची एकत्रित लोकसंख्या दहा हजारांच्यावर आहे अशा पाच किंवा सहा सलग ग्रामपंचायतींसाठी- | १ |

- याप्रमाणे ग्रामपंचायतींचे गट करुन देण्याची जबाबदारी संबंधित गटविकास अधिका-याची राहील.
- याबाबत काही विवाद (Dispute) उद्‌भवल्यास उपमुख्यकार्यकारी अधिकारी (पंचायत) यांनी तो निकाली काढावा.
- असे गट केल्यानंतर संबंधित प्रत्येक ग्रामपंचायतींनी लेखापाल/संगणक ऑपरेटर यांना द्यावयाचा मेहनताना/मोबदला देताना गटातील प्रत्येक ग्रामपंचायतींकडून समान वाटा घ्यावा.
- नियुक्तीचा करार संबंधित ग्रामपंचायती व नियुक्त होणारा कर्मचारी यांचेमध्ये करावा. त्यावर गटविकास अधिकारी यांची किंवा त्यांचे वतीने एका विस्तार अधिका-याने ( Extention Officer ) प्रतिस्वाक्षरी करावी.

*** पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावरील लेखापाल (Accountant) तथा संगणक ऑपरेटर पदासाठी शैक्षणिक अर्हता व इतर पात्रताः-**

*** शैक्षणिक अर्हता -**

(१)उमेदवार कोणत्याही शाखेचा किमान पदवीधर असावा. तथापि, वाणिज्य शाखेच्या पदवीधर उमेदवारास प्राधान्य द्यावे.

(२)उमेदवार महाराष्ट्र ज्ञानमंडळाची एम.एस.सी.आय. टी. (MS-CIT) परीक्षा उत्तीर्ण असावा. तसेच, तो टायपिंगची परीक्षाा उत्तीर्ण असावा.

(३) सर्वसाधारणपणे वापरात असलेल्या अकाउंटींग सॉफ्टवेअर्सचा अकाउंट टॅयलीचा कोर्स उत्तीर्ण असावा.

**वय** - २१ ते ३५ वर्ष
**एकत्रित मासिक फी** - रु. ८००० /- प्रतिमहा,
**नेमणूकीचा कालखंड** - ११ महिने

*** कर्तव्ये व जबाबदा-या-**
१) पंचायत राज संस्थांचे लेखे प्रिया सॉप्ट (Model Accounting System ) या संगणकीय Web Base Online आज्ञावलीत ठेवणे.
२) तसेच, केंद्र शासनाकडून वेळोवेळी प्राप्त होणा-या e-PRI च्या संदर्भातील इतर आज्ञावलीत माहिती भरणे
३) पंचायत राज संस्थांचे प्रशासकीय अधिकारी जी कामे सोपवतील ती पार पाडणे.

*** ग्रामपंचायत स्तरावर कनिष्ठ अभियंता घेणे-**

**कनिष्ठ अभियंता** - प्रत्येक पंचायत समिती अंतर्गत येणा-या सर्व ग्रामपंचायतीसाठी प्रत्येक पंचायत समिती गणासाठी एक कनिष्ठ अभियंता यांची आऊटसोर्सिंग पध्दतीने कंत्राटी स्वरुपात सेवा उपलब्ध करुन घेणे. मात्र १०००० पेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या ग्राम पंचायतीला स्वतंत्र कनिष्ठ अभियंता नेमण्याची मुभा राहील.
**वय- २१ ते ३५.**
**एकत्रित मासिक फी**- रु. १०,०००/- प्रतिमाह.
**शैक्षणिक अर्हता-** उमेदवार मान्यताप्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकी शाखेची पदवी/ पदविका उत्तीर्ण असावा. तथापि पदवीधर उमेदवारास प्राधान्य द्यावे.
**नेमणूकीचा कालखंड**-११ महिने.
**कर्तव्ये व जबाबदा-या-** १) हाती घ्यावयाच्या कामाचे अंदाजपत्रक तयार करणे.
२) सदर कामांसाठी सक्षम प्राधिका-याकडून तांत्रिक व प्रशासकीय मान्यता मिळविणे.
३) तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेनंतर सुरु झालेल्या कामावर देखरेख ठेवणे.
४) कामाचे तांत्रिक पर्यवेक्षण व निरीक्षण करणे.
४) ठरविलेल्या मानकांनुसार कामाचा दर्जा राहिल याची दक्षता घेणे.
५) पूर्ण झालेल्या कामाचे मोजमाप घेणे.
६) झालेल्या कामाची बीले विहीत केलेल्या पद्धतीनुसार तयार करून ती संबंधीतास अदा करणे.
७) तसेच पंचायत राज संस्थांचे प्रशासकीय अधिकारी जी कामे सोपवतील ती पार पाडणे.

*** पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावर संगणक तज्ञांची सेवा उपलब्ध करुन घेणे-**
**वय- २१ ते ३५,**
**शैक्षणिक अर्हता-** १) उमेदवार मान्यताप्राप्त विद्यापीठाची संगणक पदवी अथवा पदविका उत्तीर्ण असावा. तथापि पदवीधर उमेदवारास प्राधान्य द्यावे.
२) एन.आय.सी. च्या उपलब्ध यादीतील उमेदवार असल्यास प्राधान्य द्यावे.
**एकत्रित मासिक फी**- रु. १०,०००/- प्रतिमाह.
**नेमणूकीचा कालखंड**- ११ महिने.
**कर्तव्ये व जबाबदा-या-**
**१)** पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावरील संगणकांच्या हार्डवेअर तसेच जोडणी (LAN) संदर्भात काही तांत्रिक समस्या उद्भवल्यास ती समस्या सोडविणे.
२) पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावर वापरण्यात येणा-या सॉफ्टवेअरमध्ये काही तांत्रिक समस्या उद्भवल्यास ती समस्या सोडविणे.

*** नेमणूकीची पध्दती -**

लेखापाल (Accountant) तथा संगणक ऑपरेटर , कनिष्ठ अभियंता (Junior Engineer) व पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावर संगणक तज्ज्ञाची (Computer Experts) ची नेमणूक करण्यासाठी जिल्हा स्तरावर एक समिती असेल.

*** समितीचे सदस्य व रचना-**

मुख्य कार्यकारी अधिकारी - समिती प्रमुख.
अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी- समिती उपप्रमुख
मुख्य लेखा व वित्त अधिकारी - सदस्य
उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य) - सदस्य सचिव
उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) - सदस्य
समाजकल्याण अधिकारी-सदस्य
कार्यकारी अभियंता (बांधकाम )- सदस्य

*** पालन करावयाची कार्यपद्धती -**

१) ग्रामपंचायत स्तरावर लेखापाल (Accountant) तथा संगणक ऑपरेटर,कनिष्ठ अभियंता (Junior Engineer) व पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावर संगणक तज्ञाची (Computer Experts) सेवा उपलब्ध करणेस आऊटसोर्सिंगसाठी शासन नियमानुसार जिल्हास्तरावरून जाहिरात प्रसिध्द करावी.

२) सदर पदासाठी अर्ज केलेल्या पात्र उमेदवारांमधून लेखी परीक्षा व मुलाखतीच्या आधारे अंतिम निवड करण्याचे अधिकार समितीकडे असतील.यासाठी एकूण १०० गुणांची परीक्षा घ्यावी. त्यापैकी लेखी परीक्षा ८० गुणांची व तोंडी परीक्षा २० गुणांची असावी.

३) जिल्ह्यातील लेखापाल (Accountant) कम डेटा एन्ट्री ऑपरेटर, कनिष्ठ अभियंता (Junior Engineer), संगणक तज्ञ यांच्या एकूण असलेल्या गरजेपेक्षा २५ टक्के जास्त मनुष्यबळाची निवड यादी (Select List ) तयार करावी.

४) जिल्ह्यातील एकूण गरजेइतक्या मनुष्यबळाची निवड जिल्हास्तरावर असलेली सदर समिती करेल. समितीने निवड केलेल्या उमेदवारांचे पॅनेल जिल्हास्तरावर असेल. या पॅनेल मधून प्रत्येक पंचायत समितीच्या गट विकास अधिका-यास त्याच्या गरजेनुसार सदर समितीने मनुष्यबळ उपलब्ध करून द्यावे.

५) नेमणूक झाल्यानंतर जर एखादा लेखापाल (Accountant) कम डेटा एन्ट्री ऑपरेटर, कनिष्ठ अभियंता (Junior Engineer) , संगणक तज्ञ मध्येच काम सोडून गेला तर त्या व्यक्तीस पुन्हा पॅनेलवर घेऊ नये.

६) नेमणूक करण्यात आलेल्या लेखापाल (Accountant) कम डेटा एन्ट्री ऑपरेटर, कनिष्ठ अभियंता (Junior Engineer), संगणक तज्ञ यांना द्यावयाच्या एकत्रित मासिक मोबदल्याची अदायगी करण्याची अंतिम जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील, यासाठी त्यांनी जिल्हा परिषद,पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावरील प्रदानाची कार्यपध्दती उपरोक्त निवड समितीच्या सल्ल्याने निश्चित करावी. सदरचा खर्च १३ व्या वित्त आयोगाच्या प्राप्त निधीतून करुन १३ व्या वित्त आयोगाच्या संबंधित लेखाशीर्षात खर्च नोंदवावा.

२३१५

७) जिल्हा परिषदेच्या सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पंचायत राज संस्थांसाठी लेखापाल तथा संगणक ऑपरेटर, कनिष्ठ अभियंता व संगणक तज्ञ यांच्या सेवा आऊटसोर्सिंगच्या माध्यमातून कंत्राटी पध्दतीने उपलब्ध करुन घेण्यासाठी वरील परिपत्रकातील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे व याबाबत कार्यवाही तात्काळ करावी.

सदरचे परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबासाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक- **२०१०१२०८१४१९३२००१** असा आहे.

**(एकनाथ मोरे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव (ग्रा.बि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई . (पाच जादा प्रतीसह)
महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा),नागपूर (पाच जादा प्रतीसह)
सर्व विभागीय आयुक्त.(महसूल)
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
संचालक तथा मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा सर्व विभाग)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे समाज कल्याण अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे कार्यकारी अभियंता (बांधकाम)
सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग मंत्रालय, मुंबई - ३२
वित्त विभाग (व्यय-१५/अर्थोपाय / वित्त आयोग कक्ष / अर्थसंकल्प-१७)
निवड नस्ती का.क्र.वित्त-४,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.